नियतकालिक बदल्या-सन २०२३
**अधिव्याख्याता, शासकीय कला महाविद्यालय,**
**महाराष्ट्र कला शिक्षण सेवा, गट -अ**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन आदेश क्रमांकः बदली-२०२३/प्र.क्र.६१/तांशि-६**
मंत्रालय विस्तार भवन,मादाम कामा रोड
हुतात्मा राजगुरु चौक,मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ३० मे, २०२३

**शासन आदेश :**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने अधिव्याख्याता, शासकीय कला महाविद्यालय, महाराष्ट्र कला शिक्षण सेवा, गट - अ या संवर्गातील अधिकारी यांची बदली खालीलप्रमाणे करण्यात येत आहेत. बदलीनंतर संबंधित अधिव्याख्याता यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोरील स्तंभ-३ येथे दर्शविलेल्या ठिकाणी करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिव्याख्याता यांचे नाव व कार्यरत संस्था | बदलीनंतरच्या पदस्थापनेचे ठिकाण | बदलीचा प्रकार |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | श्री. राजेंद्र गिरी, शासकीय कला व अभिकल्प महाविद्यालय, औरंगाबाद | शासकीय कला व अभिकल्प महाविद्यालय, नागपूर | विनंती |

२. सदर बदली आदेश तात्काळ अंमलात येतील.

३. उपरोक्त प्रमाणे विनंती बदली झालेल्या अधिव्याख्याता यांस शासन नियमानुसार पदग्रहण अवधी, प्रवास भत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय राहणार नाही.

४. सदर बदली आदेशाची प्रभावीपणे अंमलबजावणी होणे गरजेचे असल्यामुळे बदली झालेल्या अधिव्याख्याता यांस संबंधित अधिष्ठाता यांनी तात्काळ कार्यमुक्त करावे. बदली झालेल्या अधिकाऱ्यांस कार्यमुक्त करण्याची जबाबदारी वैयक्तिकरीत्या संबंधित अधिष्ठाता यांची राहील.

५. बदली झालेले अधिव्याख्याता यांस त्यांच्या संबंधित संस्थेकडून कार्यमुक्त होऊन रुजू होण्यासाठी आल्यानंतर त्यांना संबंधित अधिष्ठाता यांनी विनाविलंब रुजू करुन घ्यावे. सदर अधिव्याख्याता यांना रुजू करुन न घेतल्यामुळे काम न करता वेतन व भत्ते देण्याचा प्रसंग उद्भवल्यास संबंधित अधिष्ठाता यांना जबाबदार धरण्यात येईल.

६. प्रस्तुत आदेशाची अंमलबजावणी प्रभावीपणे होण्याकरिता संचालक, कला संचालनालय यांनी पाठपुरावा करावा. तसेच, याबाबतचा कार्यपालन अहवाल या आदेशाच्या दिनांकापासून १५ दिवसांच्या आत शासनास सादर करावा.

७. बदली झालेल्या अधिव्याख्याता यांची कोणतीही रजा शासनाच्या पूर्वमान्यतेशिवाय मंजूर करण्यात येऊ नये.

८. सदर बदल्यांचे आदेश निर्गमित झाल्यानंतर महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियमानुसार दिलेल्या पदग्रहण अवधीत, संबंधित अधिव्याख्याता यांनी बदलीच्या ठिकाणी रुजू होण्याची दक्षता घ्यावी. अन्यथा त्यांचा अनुपस्थितीचा कालावधी हा अकार्यदिन (dies non) म्हणून गणला जाईल.

९. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०५३०२०१६५८०००८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by HUSSEIN ALIMIYA MUKADAM
Date: 2023.05.30 20:19:10 +05'30'

**( हुसेन अ. मुकादम )**
**अवर सचिव ,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्री. राजेंद्र गिरी, अधिव्याख्याता, शासकीय कला व अभिकल्प महाविद्यालय, औरंगाबाद

**प्रत,**

१) मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई.
२) प्रधान सचिव,उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
३) संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४) अधिष्ठाता, शासकीय कला व अभिकल्प महाविद्यालय, नागपूर/ औरंगाबाद ( कला संचालनालयामार्फत )
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा) मुंबई / नागपूर, महाराष्ट्र १ /२.
६) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी (कला संचालनालयामार्फत )
७) निवड नस्ती - तांशि -६.